**आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून प्रति विधानसभा मतदारसंघ तसेच प्रति विधान परिषद सदस्य यांना अनुज्ञेय असलेल्या स्थानिक विकास निधीत वाढ करून प्रतिवर्षी रू. ४.०० कोटी करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र. स्थाविका-२०२०/प्र.क्र. ७६/का.१४८२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना:**

जिल्हा वार्षिक योजना राबविताना स्थानिक लोकांना उपयुक्त असलेली व सहजरित्या पूर्ण होणाऱ्या लहान कामांना आवश्यक असलेला निधी कमी प्रमाणात उपलब्ध होतो. यामध्ये शाळाखोल्या बांधकाम, अंगणवाडी केंद्र बांधकाम, व्यायामशाळा बांधकाम, स्मशानभूमीची कामे, शौचालये बांधकाम, कोल्हापूर पध्दतीचे लहान बंधारे इ. प्रकारच्या लहान कामाचा समावेश आहे. स्थानिक लोकांच्या गरजा पूर्ण करण्याकरीता विधानसभा व विधानपरिषद सदस्य यांना आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०११-१२ या आर्थिक वर्षा पासून रु. २.०० कोटी एवढा निधी उपलब्ध करून दिला जात होता. तथापि, बांधकाम व इतर साहित्याच्या दरसूचीत झालेली साधारण भाववाढ आणि आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत यापूर्वी निर्माण करण्यात आलेल्या वास्तूंची देखभाल व दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध होण्याची आवश्यकता विचारात घेता, सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणात घोषित केल्यानुसार आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षापासून विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य यांना प्रतिवर्षी रु. ३.०० कोटी निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे. "सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पातील अनुदानाच्या मागण्या" या विषयावरील चर्चेला उत्तर देतांना मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांनी दिलेल्या आश्वासनानुसार आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत विधीमंडळ सदस्यांच्या मतदार संघाकरिता प्रतिवर्षी रु. ३.०० कोटी एवढया अनुज्ञेय निधीत (आमदार निधीत) रु. १.०० कोटीची वाढ करून सदर निधी रु. ४.०० कोटी एवढा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षापासून विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य यांना प्रतिवर्षी अनुज्ञेय असलेल्या रु. ३.०० कोटी एवढया निधीत रु. १.०० कोटीची वाढ करून प्रतिवर्षी रु. ४.०० कोटी करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य यांना उपलब्ध होणाऱ्या रु. ४.०० कोटी निधीमधून संदर्भीय नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दिनांक १२.७.२०१६ अन्वये व तद्नंतर वेळोवेळी निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनुनांसार स्थानिक लोकांच्या गरजेनुसार उपयुक्त व सहजरित्या पूर्ण होणारी लहान कामे घेता येतील.

३. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून उपलब्ध होणाऱ्या प्रतीवर्ष रु. ४.०० कोटी निधीमधून १०% निधी नियोजन विभागाच्या शासन परिपत्रक क्र. स्थाविका-०७२०/प्र.क्र. ६४/का. १४८२, दिनांक २४ ऑगस्ट, २०२१ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत तसेच अन्य शासकीय कार्यक्रम/योजनांतर्गत बांधण्यात आलेल्या वास्तू / मालमत्तांच्या देखभाल व दुरुस्तीकरिता खर्च करता येईल.

४. वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ ३६३/२०२१/व्यय-८, दि.२९ सप्टेंबर, २०२१ अन्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.go.in या सकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११०१४११५५५४९९१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.10.18 12:47:10 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत अग्रेषित,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, ( ५ प्रती)
२) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा. उपसभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) मा. उपाध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९) मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

१०) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११) मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य (सर्व)
१३) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व ), मंत्रालय, मुंबई
१५) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१६) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
१७) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
१८) विभागीय आयुक्त, (सर्व),
१९) जिल्हाधिकारी, (सर्व),
२०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
२१) नियोजन विभागातील सहसचिव/उपसचिव, (सर्व)
२२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२४) उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांची कार्यालये, (सर्व)
२५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२६) जिल्हा नियोजन अधिकारी, (सर्व)
२७) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
२८) वित्त विभाग, (का. व्यय-८/अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई
२९) भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-२०, ( ५ प्रती)
३०) इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग,दादर, मुंबई-२५, ( ५ प्रती)
३१) नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१ (५ प्रती),
३२) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८, ( ५ प्रती)
३३) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१, ( ५ प्रती)
३४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी,३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई- ४०० ०२९ ( ५ प्रती)
३५) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोबमिल पॅलेस, वरळी, मुंबई ( ५ प्रती)
३६) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८ ( ५ प्रती)
३७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (१० प्रती)
३८) निवड नस्ती/का-१४८२, मंत्रालय, मुंबई.